कालिकामातेचा आशीर्वाद मिळावा म्हणून मच्छिंद्रनाथ कोकणात, कुडाळ प्रांती आले होते. पण त्या उग्र प्रवृत्तीच्या देवतेचा काही गैरसमज झाला आणि नाहक समरप्रसंग उद्भवला. कालीकामातेवर श्रद्धा असूनही तिची नितांत भक्ती करणाऱ्या नाथांना आपले श्रेष्टत्व दाखवण्यासाठी साक्षात देवतेला पराभूत करावे लागले पण श्री शिवाच्या आगमनाने वातावरणातला जबरदस्त तणाव निवळला कारण मच्छिंद्रांना ज्या काही सिद्धी प्राप्त करावयाच्या त्या केवळ जगत् कल्याणाच्या, लोककल्याणाच्या सद्‌हेतूनेच त्यांचा विनियोग व्हावयाचा होता. त्यांत त्यांचा लावमात्रही व्यक्तीक स्वार्थ नव्हता. श्री शिवाच्या आग्रहाला मान देऊन कालिकामाता मच्छिंद्रांना सहाय्य करण्यासाठी राजी झाली. त्यामुळे शाबरी काव्यात न्यूनता राहिली नाही. कोकणातील कुडाळ प्रांतात तीन दिवस देवीचा पाहुणचार घेतल्यानंतर नाथ उत्तरेकडे भ्रमंती करीत हरेश्वर स्थानी आले.

उत्तर कोकणात, हरेश्वर हे तीर्थस्थान आहे. गदातीर्थात स्नान करून मनोभावे पर्वताला प्रदक्षिणा घालण्यास त्यांनी प्रारंभ केला. नाथांच्या प्रदक्षिणा चालू असतांना त्यांना वीरभद्र भेटला. शिवपुत्र विरभद्राने मानवी देहावर साधुवेश धारण केला होता. हातात त्रिशूल, डमरू, धनुष्य, शैली, शिंगी, गळयात रुद्राक्षमाला अशा स्वरूपातील त्याचा आभास साक्षात शंकराप्रमाणे प्रचीती देत होता. शैली, शिंगीचा मंजुळ आणि सात्विक निनाद मन प्रसन्न करणारा होता. त्या धीर गंभीर ध्वनिनेच मनोकामना पूर्ण व्हाव्यात. रज-तम सत्व या तिन्ही महाघातक दुर्गुणांचा नाश करणारे त्रिशूल तळपत होते. डमरू या वाद्‌याचे वैशिष्ट्ये म्हणजे त्याचे आगम आणि निगम हे दोन बोधक भाग. काम आणि क्रोध यांसारख्या षड्‌विकारांना भेदून त्यांना नष्ट करणारे धनुष्यबाण! ते केवळ बाण नव्हेत तर अनंतरूपी अंधःकाराचा नाश करून ब्रह्मज्ञानाचा प्रकाश प्रसारित करणारे विवेकरुपी चाप बाण होते. अशा आयुधांनी विभूषित असा महाप्रतापी, प्रतापरुद्र, देवांचा सेनापती वीरभद्र स्नानास जाताना केवळ योगायोगाने मार्गात नाथांना भेटला. त्याने नाथांना हटकले आणि विचारणा केली, "स्वामी महाराज! आपण कोण?

नाथ उत्तरले, "या देहाला मच्छिंद्र म्हणतात."

"कोणत्या पंथाची दीक्षा घेऊन वावरत आहात? पंथाच्या कोणत्या खुणा मिरवीत आहात?" या प्रश्नांच्या फैरीवर नाथ उत्तरले, "मी नाथपंथी जोगी आहे आणि शैली, शिंगी, कंथा, मुद्रा, ही आमची आभूषणे आहेत. त्यावर कुचेष्टेने वीरभद्र विचारता झाला, "अल्प बुद्धी आणि अज्ञानाने कान फाडलेले दिसत आहेत" त्यावर नाथ म्हणाले, "आपण म्हणता तसे नाही, गुरु आज्ञेने कान फाडून कानफडी नाथपंथ निर्माण करण्यात आला आहे.

उपहासाने हास्य करीत वीरभद्र अवहेलना करीत म्हणाला, "काय पाखंड मांडले आहे, काही तरी सोंगे ढोंगे जगात फिरायचे आणि धर्माच्या नावास कलंकित करण्याचे उद्‌योग आहेत. असा दांभिकपणा करून शहाजोगपणे फिरण्यापेक्षा हे सोंग सोड! नाही तर इथल्या इथे तुला शिक्षा करीन, कोण गुरु आहे रे तुझा? वेदविधी विरुद्ध भलताच ढोंगीपणाचा पंथ निर्माण करणारा तो मुर्खाहून शतमूर्ख असला पाहिजे"

विरभद्राच्या मुखातून निघालेली गुरूविषयीची निंदा ऐकून मच्छिंद्रनाथ संतप्त होऊन म्हणाले, "अरे अधमा!! फारच वाचाळ बोलतो आहेस! माझ्या गुरूला शतमूर्ख म्हणून स्वतःच्या डोईवर गुरुनिंदेचे पाप का ओढवून घेत आहेस? पर आत्म्याला दुःखदायक वेदना दिल्यास पाप लागते. एवढे साधे तत्व तुझ्या गुरूने तुला शिकविले नाही का? तुझा गुरु

कोण आहे रे?? अन्य कोणी ज्ञानी गुरु शोध. तुझ्यासारख्या निंदकाचे ओंगळ दर्शन झाल्याने मला पुन्हा स्नान केले पाहिजे. आता ज्या कामासाठी निघाला आहेस तिथे चालता हो, नाही तर मीच तुला शिक्षा करीन. चल निघ इथून!!"

विरभद्रानेही संतप्त होऊन गर्जना केली, "भ्रष्टा!! तुला आता यमलोकातच पाठवितो" असे म्हणून धनुष्याची प्रत्यंचा ताणून टणत्कार केला. भात्यातून अर्धचंद्राकृती बाण काढून प्रत्यंचेवर लावला. ते पाहून मच्छिंद्रनाथ म्हणले, "पाप्या!! तुझ्या पापाचा घडा भरला असावा म्हणूनच तू असा उर्मटासारखा वागत आहेस. धनुष्य बाण काढून मला शौर्य दाखवतोस? याचा परिणाम ठीक होणार नाही. नाहक मरशील! तुझ्यासारखे बहुरूपी समरांगणात शौर्य गाजवीत नाहीत. ज्याप्रमाणे शेळीच्या गळयाला असणाऱ्या स्तनातून दुध येत नाही, तसेच बहुरुप्यांच्या शौर्यचे असते.

वीरभद्र उत्तरात म्हणाला; "मूर्ख ऐक! तू माझ्यासामोर आला आहेस ते केवळ तुझे आयुष्य संपले असावे म्हणूनच! तुझ्या गुरूने तुला काय प्रताप शिकवला आहे त्याचे प्रात्यक्षिक आता दाखव मी तर साक्षात तुझा काळ बनून आलो आहे.

मच्छिंद्रनाथ म्हणाले, "अरे अर्भका! अशा गुरूंचा आशीर्वाद माझ्या शिरावर आहे की साक्षात देव, दानव आणि मानव त्यांच्यापुढे नतमस्तक होतात. त्यांच्यासमोर तुझे काय पाड? प्रखर तेजाच्या सूर्यनारायणापुढे तुझ्यासारखा काजव्याचा काय उजेड पडणार?"

ह्या भाष्यावर वीरभद्र म्हणाले, "अरेरे!! तुझे मरण जवळ आल्यामुळे तुझा तोल बिघडला आहे म्हणूनच तुझी जिव्हा वल्गना करीत आहे. तू वादविवाद करीत आहेस त्याची परिणती तुझ्या नाशातच होणार आहे. आता अंतिमक्षणी रामनाम घे!"

मच्छिंद्रनाथ म्हणाले, "अरे ! तुला राममंत्र साधा वाटतो काय? त्या रामनामानेच श्रीशंकराचा दाह शांत झाला, वाल्याचा वाल्मिकी झाला. ते रामनामच मला तारील. रामनामाचे महात्म्य न जाणणाऱ्या अज्ञानी उन्मता! सावधान!! तयार हो." असे म्हणून नाथांनी भस्मझोळीतून चिमुटभर विभूती काढून त्यावर वज्रास मंत्रून देहाभोवती वज्रकवच तयार केले.

वीरभद्राने आकर्ण प्रत्यंचा ताणून अर्धचंद्राकृती बाण सोडला. आकाश मार्गे आक्राळ विक्राळ ध्वनी करीत तो बाण झेपावून मच्छिंद्राचे प्राण घेण्यासाठी आला. धाडकन वज्रकवचावर आढळून त्याचे चूर्ण चूर्ण झाले. मग त्याने शक्तीअस्त्राच्या माध्यमातून दुसरा बाण सोडला. पाठोपाठ तिसऱ्या बाणावर नागास्त्र स्थापन केले आणि प्रत्यंचा खेचला. एका पाठोपाठ दोन अस्त्र बाण आकाशात ध्वनींचा कल्लोळ करीत झेपावले. शक्तीने भयानक कडकडाट केला. देव, दानव, यक्ष, मानव सर्व सजीव भयभीत होऊन थरथरत होते. आश्रयाच्या शोधात पळापळ सुरु झाली. प्रलयध्वनीच निनादात होता. त्या ध्वनीकंपनाने डोंगर दऱ्यांचे कडे कोसळून पडू लागले. सहस्त्र विजांचा एकत्रित कडकडाट व्हावा तसा आवाज करीत शक्तीने वज्रावर आघात केला. वज्र दुभंगले आणि निष्प्रभ झाले. पाठोपाठ नागास्त्र आले, वीरभद्राचे दोन्ही बाण येतांना पाहून मच्छिंद्रनाथांनी त्याचवेळी रुद्रास्त्र आणि गरुडास्त्र सोडून प्रतिहल्ला चढविला होता. रुद्रास्त्राच्या प्रभावाने अकरा रुद्र प्रकट झाले. शक्तीने वज्र भेद्ताच अकरा रुद्रांनी तिला कवळून धरणीवर आपटून निपचित केले आणि त्याचवेळी गरुडाने नागस्त्राचा पाठलाग केला. त्यामुळे युद्धाला सामोरे जाण्याऐवजी नागास्त्राची भयाने घाबरगुंडी उडाली आणि प्राणभयास्तव पलायन करून लपण्यासाठी आश्रय शोधू लागले.

प्रतापसूर्य वीरभद्राचा हल्ला अविरत सुरु होता. त्याने वातास्त्र सोडताच नाथांनी पर्वतास्त्राने त्याला थोपविले. विरभद्राने पर्वतास्त्रावर वज्रास्त्र मारून पर्वतांचे चूर्ण केले. त्यानंतर त्याने तातडीने अग्नीस्त्र सोडले. त्यावर नाथांनी जलदास्त्र सोडून अग्नी शांत केला. विरभद्राच्या कामास्त्रावर नाथांनी रत्यस्त्र सोडले, त्यामुळे काम रती समवेत रत होऊन शांत झाला. त्यानंतर विरभद्रानी महानागास्त्र सोडताच नाथांनी संजीविनी अस्त्र सोडले. विरभद्राने अत्यंत संतापने दानवास्त्राने राक्षस प्रकट केले. तर त्याच्यांवर प्रतिहल्ला करण्यासाठी नाथांनी देवाश्र मंत्रून देव प्रकट केले. दानावास्त्राचा पडाव झाला.

हल्ल्यावर प्रतिहल्ला तोडीस तोड होतोय हे पाहून दोघेही महावीर एकमेकांच्या युद्धकौशल्याविषयी आदर व्यक्त करू लागले. वीरभद्राने तर, “मी अनेक महासंग्राम करून भल्या भल्या महावीरांचा पाडाव केला आहे. पण तुझ्यासारखा वीरांचा महावीर, महायोद्धा मी पहिला नाही. तू धन्य आहेस.” अशी स्पष्ट वाचता केली.

मच्छिंद्र म्हणाले, “हे तर केवळ तुझ्या हल्ल्याचे प्रतिउत्तर आहे. माझ्याकडून त्याचे फक्त निवारण झाले आहे. माझ्या गुरूच्या वरदहस्ताचा खरा प्रताप तर अजून पुढे आहे. माझा गुरु अविनाश्वंत आहे.”

वीरभद्राने तर आदराने मच्छिंद्राच्या या वक्तव्याशी सरळ सरळ सहमती दर्शविली. ते म्हणाले, “तुझा गुरु निश्चितच प्रज्ञावान आहे आणि तू सुद्धा बुद्धिमान आणि झुंजार वीर असून तुझा आदराच केला पाहिजे कारण इतक्या प्रदीर्घ काळापर्यंत युद्धात कुणी माझ्यासमोर टिकला नाही.” पराक्रमी शत्रूचा आदर करणे हे सुद्धा मोठ्या मनाचे लक्षण आहे.

त्यानंतर वीरभद्राने ब्रह्मास्त्र फेकताच नाथांनी त्यावर विद्यास्त्र सोडले. ब्रह्मास्त्र विनाशकारी होते, तर विद्यास्त्र सृजन करणारे होते. चार मुखांचा विधाता प्रकाटताच त्यांच्यापुढे ब्रह्मास्त्र शरणागत झाले. वीरभद्राने सोडलेल्या कार्तीकास्त्रापुढे नाथांनी रतीअस्त्राचा प्रयोग करून लावण्यवती ललना उभ्या केल्या. त्यामुळे ब्रह्मचर्याचे उपासक कार्तीकास्त्र गुप्त झाले. ते पाहून वीरभद्राने काळास्त्र सोडून साक्षात काळ प्रकट केला. नाथांनी मुळ मायेच्या शक्तीने प्रलय करणारे अस्त्र निर्माण केले. काळ हा मायेचा अंकित असल्याने मुळ मायेने काळास्त्र खाऊन टाकले पण त्याच बरोबर एक अघटीत घडले. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश यांचीच कोंडी झाली, मायेने साक्षात पंचतत्वावर घाला घातला आणि त्यांना घुसळून एक रूप करण्याची प्रक्रिया सुरु झाली पंचतत्वांचा हा विनाश पाहुन सकल देव मच्छिंद्रनाथांची प्रार्थना करू लागले. ते म्हणाले, “कवी नारायणा, कलियुगाचा अस्त होण्यास अजून पुष्कळ काळ बाकी आहे, तुझ्या अस्त्रामुळे पंचतत्व नाश पावत आहेत. त्यामुळे सृष्टीचाच विनाश होईल. क्रोधाने अंध होऊन सर्वनाश करू नकोस. महाराजा!! जीवसृष्टीवर दया कर, हा प्रलय रोखून धर!” देववाणी ऐकून मच्छिंद्रनाथ तात्काळ भानावर येऊन त्यांना अस्त्रांच्या अनिष्ट परिणामाची जाणीव झाली, निष्पाप जीव सृष्टीच्या रक्षणासाठी त्यांनी त्वरित वासनिक अस्त्राची आराधना केली. वासनिक अस्त्राने ब्रह्मदेवाला सृष्टी उत्पन्न करण्याची इच्छा झाल्याने मायाप्रलय रोखला जाऊन पुन्हा सृष्टी निर्मितीसाठी पंचतत्वे कार्यरत झाली.

मच्छिंद्रनाथ आणि वीरभद्र यांच्या संग्रामाने निर्माण झालेल्या भयावह वातावरणामुळे सकल जीवसृष्टी संचित झाली होती. मच्छिंद्रनाथांनी इर्षेने यापेक्षाही भयंकर अस्त्र योजना करण्यापूर्वी ब्रह्म, विष्णू आणि महेश यांच्यासहित सकल देव प्रकट होऊन या दोन तुल्यबळ महायोद्ध्यांच्यामध्ये आडवे येऊन उभे राहिले. मच्छिंद्रनाथांची स्तुती करून त्यांचा क्रोधाग्नी शांत केला. वीरभद्रालाही शांत करून दोघांचे सख्य करून दिले. देव त्या दोघांचा समन्वय साधतांना म्हणाले,

“कवी नारायण मच्छिंद्रनाथ आणि वीरभद्र आपण दोघांनीही श्रेष्ठ कनिष्ट वादाचा संगर्ष करण्याऐवजी मित्रभावाची जोपासना करावी अशी सर्व देवांची इच्छा आहे. त्यातच सर्वांचे कल्याण आहे.” एकमेकांची खरी पारख झाल्याने दोघेही आनंदित झाले. वीरभद्र मच्छिंद्रनाथांना म्हणाले, “मच्छिंद्रनाथा! तू खरोखर धान्य आहेस. मी तुझ्यावर प्रसन्न झालो असून तुझी काय मनोकामना असेल ती मी पूर्ण करीन. तुझ्या सारखा युद्धनिपुण लढवय्या वीर मी पहिला नाही. ज्या श्रीगुरूने तुला शस्त्रविद्येत पारंगत केले तो तुझा गुरु धान्य असून मी त्याला आदरपूर्वक वंदन करतो. मला मानव, दानव, किन्नर, गंधर्व कोणीही जिंकू शकले नाहीत. सूर असुर यांनी तर माझा पराक्रम पाहून मला ‘कल्पांत भैरव’ असे नामाभिधान ठेवले आहे. परंतु मच्छिंद्रनाथा! आज तुझ्या रूपाने मला सवाई गंधर्व भेटला आहे.” असे म्हणून नाथांना त्यांनी प्रेमाने कवेत घेतले. मच्छिंद्रनाथ त्यांच्या मिठीत विसावत म्हणाले, “वीरभद्रा! आपण या प्रसंगी, मला लोकोपकारी वरदान द्यावे. मानव दुःख निवारण करण्यासाठी मला तुमचे सहाय्य हवे आहे. सकल मानवजातीच्या कल्याणासाठी मी शाबरी विद्या काव्य करीत असून, त्यांतील जे मंत्र तुझ्या संबंधी येतील, त्या मंत्रातील अर्थाप्रमाणे आपण तात्काळ कार्य सिद्ध करून मानवावर उपकार करावेत. मला एवढे वरदान द्यावे.”

“अवश्य, मच्छिंद्रनाथ!! या सर्व देवांच्या साक्षीने मी तुला वाचन देतो की शाबरी मंत्राप्रमाणे मी कार्य करीन.” असे आश्वासन वीरभद्राने दिले. उपस्थित सर्व देवांनी आनंद व्यक्त केला आणि म्हणाले, “मच्छिंद्रा!! शाबरी मंत्राप्रमाणे कार्य करण्यासाठी आम्ही वीरभद्राला सहाय्य करू.” मच्छिंद्रनाथांनी सर्व देवांना वंदन केले. श्री भगवान विष्णूच्या पायावर मस्तक टेकताच नारायणाने त्याला उठवून उराशी कवटाळले, आणि म्हणाले, “वत्सा!! संकटग्रस्तांनी माझा धावा केल्यास मी स्वतः प्रकट होऊन संकटनिवारण करीन” असे म्हणून श्री विष्णूने चक्रास्त्र भेट स्वरूपात दिले. उमानाथ श्री शंकराने प्रसन्न होऊन त्रिषुणासत्र बहाल केले. विश्वनिर्माता श्री ब्रह्मदेवाने वाचासिद्धीचा वर दिला. इंद्राने वज्रास्त्र तर कुबेराने सिद्धीचे मंत्र दिले. वरुणाने आपास्त्र देऊन मंत्रपठण करताच भूमीतून पाणी उत्पन्न करण्याचे सामर्थ्य दिले. अग्नीने अग्निमंत्र आणि अश्विनीकुमारांनी मोहिनीमंत्र दिला. अशा प्रकारे सर्व देवांनी वेगवेगळे आशीर्वाद देऊन आपआपल्या यानांतून निजस्थानाकडे जाण्यास निघाले.

त्याप्रसंगी मच्छिंद्रनाथांनी त्यांना हात जोडून विनंती केली. ते म्हणाले, “स्वर्गातील मनकर्णिका नदीत स्नान करण्याची माझी इच्छा आहे. मानवाचं दृष्टीकोनातून ती परम भाग्याची आणि आदराची बाब आहे. तरी आपण मला स्नान करण्यासाठी नेल्यास कृपा होईल.” त्यांच्या या मनोकामनेची पूर्तता करण्यासाठी देवांनी सहर्ष होकार दर्शविला. स्वतः श्रीविष्णू आपल्या यानातून वैकुंठात घेऊन गेले. श्री विष्णूंनी आपल्या परम भक्तास अर्थात मच्छिंद्रास आसनी, शयनी, भोजनगृही स्वतःच्या सहवासाचा लाभ दिल्यामुळे मच्छिंद्रांस परम संतोष झाला. नाथ दररोज मनकर्णिकेत स्नानाचा आनंद घेत होते. पूर्वावतारात मेरु पाठात येथे नावनारायण आणि वासुदेव समाधिस्त झाले होते, त्या समाध्यांचे दर्शन घेण्याची इच्छा व्यक्त करताच श्रीविष्णूने स्वतः नेऊन त्याचे दर्शन घडविले. एक वर्ष मच्छिंद्रनाथ वैकुंठामध्ये वास्तव्यास होते. तेथून पुढे एक वर्ष ते कैलासावर श्रीशिवा बरोबर राहिले. मग इंद्र देवाच्या आग्रहावरून अमरावतीत देवेंद्राचा तीन महिने पाहुणचार घेतला. तेथून ब्रह्मदेवाने नारदाला पाठवून सहा महिन्यासाठी सत्यलोकात वास्तव्यास नेले. याप्रमाणे सर्व देवांकडे अल्पकाळ का होईना वास्तव्य करून स्नेह भाव वृद्धिंगत केला. एकंदरीत सात वर्षांचा काळ देवलोकात आतिथ्य भोगण्यात गेला. त्यानंतर सर्वांचा निरोप घेऊन पुन्हा पृथ्विलोकी परतले.

हरेश्वर तीर्थक्षेत्री परतल्यानंतर पुनश्च तीर्थाटनास प्रारंभ झाला. उत्तर दिशेकडे भ्रमंती करीत सामुद्रकिनार पट्टीवरील केकाड देशांत ते पोहोचले. केकाड म्हणजे आजच्या ठाणे जिल्ह्याच्या आसपासचा भाग. त्या पावन भूमीतील वज्रवनास त्यांनी भेट दिली. या वज्रवनात वज्रेश्वरी, वज्रभगवती देवीचे तीर्थस्थान आहे. नाथांनी तीर्थात स्नान करून देवतांचे दर्शन घेतले. त्याठिकाणी उष्ण पाण्याची तीनशे आठ कुंडे पाहून त्यांना आश्चर्य वाटले. आपणही उष्णजल कुंडांची रचना करून देविमातेला संतुष्ट करावे असे नाथांनी ठरविले.

या अस्तित्वात असलेल्या उष्णजल कुंडांची निर्मिती जाणून घेण्यासाठी त्यांनी मंदिराच्या पुजाऱ्याकडे विचारणा केली असता त्याने इतिहास सांगितला, तो असा; "पुराणकाली येथे वसिष्ठ ऋषींनी महायज्ञ केला होता. त्यावेळी सर्व देव यज्ञासाठी उपस्थित होते. बारा वर्षे बारा दिवस यज्ञ चालला होता. तेव्हा देवांनी स्नान करण्यासाठी ही गरम पाण्याची कुंडे तयार केली होती. यज्ञ समाप्ती नंतर देव स्वस्थानी गेले. परंतु ही उष्ण कुंडे अद्यापी विखुरलेल्या अवस्थेत अस्तित्वात आहेत.

त्यानंतर मच्छिंद्रनाथांनी मनात योजल्याप्रमाणे कृती करण्याचे ठरविले. तेथून वाहणाऱ्या सरस्वती नदीच्या पात्रातील एक उंच अशी जागा शोधून, अग्नी देवाने वरदान स्वरूप दिलेल्या मंत्राने अग्नी निर्माण केला. श्री शिवाने दिलेले त्रीशुळास्त्र जपून हातातील त्रिशूळ बुडाकडून कुंडच्या पाण्यात टाकले. त्यामुळे अग्नीचा प्रवेश होऊन पाणी उष्ण झाले. नाथांनी स्वतः स्नान करून देवतेलाही उष्णोदकाने स्नान घातले. वज्रभगवती अंबामाता प्रसन्नतेने प्रकटली आणि म्हणाली, "वत्सा मच्छिंद्रा! तू मला भोगावतीच्या उष्णोदकाने स्नान घालून प्रसन्न केले आहेस. आता माझ्याकडे एक मास वास्तव्य करून माझे आतिथ्य स्वीकारावेस."

"माते! तुझी आज्ञा मला शिरसावंध आहे." असे म्हणून नाथांनी तेथे एक महिना वास्तव्य केले. आपल्या विनम्रतेने आणि मधुर वाणीने भाषण करीत देवीचे मन जिंकत काळ क्रमू लागला. एके दिवशी नाथांनी विचारले, "माते, तुझे वज्राबाई असे नाव का पडले?" देवीमाता सांगू लागली. "वसिष्ठांच्या यज्ञ प्रसंगी सर्व देव आणि ऋषीमुनी सभास्थानी बसले असता देवराज इंद्र सैन्यसह आला. सभास्थानी देवेंद्र येताच उपस्थितांनी त्यांना उत्थापना दिली नाही. त्यामुळे आपला अपमान झाला असा समज त्यांनी केला आणि ते क्रोधीत झाले. त्यांनी त्या सभास्थानावर वज्राचा मारा केला. ते पाहून दशरथी रामाने दर्भाच्या बाणावर शक्तीमंत्र जपून तो बाण वज्राला थोपविण्यासाठी सोडला. त्यावेळी मी दर्भातून प्रकट होऊन वज्र गिळून सर्वांचे रक्षण केले. मग देवेंद्र रामाची स्तुती करीत शरण गेला आणि वज्र परत मागितले असता रामाने प्रसन्न होऊन त्यास वज्र परत केले. मग सर्व देव आणि ऋषी यांनी प्रभू रामाच्या हस्ते माझी येथे स्थापना करून मला वज्राबाई असे नांव दिले."

देवी पुढे म्हणली, "दशरथी रामाने भोगावतीच्या पाण्याने स्नान घालून माझी येथे स्थापना केली आहे. त्यानंतर तुझ्या हस्ते भोगावती उदक पुन्हा प्राप्त झाले. उष्णोउदकाने स्नान घालून मला तर प्रसन्न केले आहेसच, तसेच भोगावतीच्या अखंड जलस्त्रोत निर्माण करून दिला आहेस. तू धन्य आहेस." असो या उष्णजलकुंडाचे वैशिष्ट्य म्हणजे कितीही तीव्र उन्हाळा असला, नदीचे पाणी आटले तरीही उष्णजलकुंड आटत नाही.

एक मासानंतर वज्रेश्वरीमातेचा आशीर्वाद घेऊन मच्छिंद्रनाथ उत्तर दिशेने भ्रमंती करीत द्वारावती येथील तीर्थ करून आयोध्या नगरीच्या दिशेने मार्गस्थ झाले.

**फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने चिंता, व्यथा नष्ट होतील. जन्म मरणाच्या फेऱ्यातून मुक्ती मिळून पुनर्जन्म येणार नाही. जखीण भयापासून मुक्ती मिळेल.**